**राज्यात नवीन प्राथमिक कृषी पत पुरवठा सहकारी संस्था नोंदणी करणे व कार्यरत संस्थांचे सक्षमीकरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन शुध्दीपत्र क्र. ससेवा ९११/प्र.क्र. १०४७/२-स**
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२
दिनांक - १४ फेब्रुवारी २०१७

<u>वाचा</u> - १. शासन निर्णय क्र. ससेवा - ९११ / प्र.क्र. १०४७ / २-स, दि. २३.९.२०१३
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि. २०.९.२०१६ चे पत्र.

<u>प्रस्तावना-</u>

राज्यात नवीन प्राथमिक कृषी पतपुरवठा संस्थांची नोंदणी करणे व कार्यरत संस्थांचे सक्षमीकरण करण्याबाबत दि. २३ सप्टेंबर, २०१३ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील निकष क्र. १ व ३ विचारात घेता एका महसुली गावात संस्था अस्तित्वात असल्यास व त्याच महसुली गावात नवीन प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थेचा प्रस्ताव दाखल झाल्यास व शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे संभाव्य कृषी व कृषी पुरक पतपुरवठा तसेच जोखीम संपत्तीचे भांडवलाशी प्रमाण याची पुर्तता होत असल्यास अशा वेळी त्याच महसुली गावात अस्तित्वात असलेल्या संस्थे व्यतिरीक्त नवीन नियोजीत संस्थेची नोंदणी करावी किंवा कसे याबाबत मार्गदर्शन मिळण्याची सहकार आयुक्त व निबंधक यांनी शासनास विनंती केली आहे.

संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयाच्या अनुषंगाने नियोजित प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांच्या नोंदणीबाबत सहायक निबंधक, जिल्हा उपनिबंधक व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था यांनी दिलेल्या निर्णयाविरुध्द मोठ्या संख्येने पुनरिक्षण अर्ज शासनास प्राप्त झाले आहेत. अशा प्रस्तावांची गुणवत्तेवर छाननी केली असता अनेक नियोजित संस्था संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयातील निकष क्र. २ मधील आर्थिक निकषाची पुर्तता करीत असल्याचे निदर्शनास आले आहे.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयातील निकष क्र. १ मध्ये सुधारणा करणे आवश्यक असल्याची शासनाची खात्री झाल्यामुळे या निकषात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन शुध्दीपत्र</u>

संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयातील निकष क्र. १ ऐवजी खालीलप्रमाणे वाचावे.

१) एका महसूली गावात शक्यतो एकच प्राथमिक कृषि पतपुरवठा सहकारी संस्था असावी. तथापि, अर्थक्षमतेचे अन्य निकष विचारात घेऊन ज्या गावात एकापेक्षा जास्त संस्थांची नोंदणी करण्यास वाव आहे, अशा गावात एकापेक्षा जास्त संस्थांची नोंदणी करता येईल.

१अ) नियोजित प्राथमिक कृषी पत पुरवठा सहकारी संस्थेने संस्थेच्या नोंदणीपूर्वी किमान रु. ५ लाख भागभांडवल जमा करणे आवश्यक आहे.

१ ब) नियोजित संस्थेची नोंदणी झाल्यानंतर एक वर्षाच्या कालावधीत संस्थेने किमान एक व्यवसाय सुरु करणे आवश्यक राहील.

उपरोक्त सुधारीत निकषांचे सर्व संबंधितांनी तंतोतंत पालन करावे.

सदर शासन शुध्दीपत्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०२१४१७३०४२६५०२ असा आहे. हे शासन शुध्दीपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.02.14 17:32:49 +05'30'

**(दिपक राणे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत -**

१. मा. मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव
२. मा. मंत्री, सहकार पणन व वस्त्रोद्योग यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री, सहकार यांचे खाजगी सचिव
४. मा. विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य (सर्व)
५. अपर मुख्य सचिव, (सहकार) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे स्वीय सहायक
६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड, पुणे
८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (प्रशासन / लेखापरिक्षण) (सर्व)
९. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१०. जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (वर्ग -१) (सर्व)
११. उप / सहा. निबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई
१३. कार्यकारी संचालक / व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., (सर्व)
१४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने
१५. निवड नस्ती - २-स